**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अर्थसंकल्पिय तसेच केंद्रीय योजनांतर्गत रस्ते व इमारतींची मूळ आणि देखभाल दुरुस्तीच्या कामांचे BEAMS संगणकीकृत प्रणालीव्दारे संनियत्रण करणेबाबत**

## महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन परिपत्रक क्रमांकः आविवि-२०१८/प्र.क्र. ३३ /बांव्यक

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर ,२०१८

**<u>प्रस्तावना :</u>**

केंद्र व राज्य शासनाने शासकीय कामकाजामध्ये पारदर्शकता व सुसूत्रता यावी तसेच शासकीय कामांबाबत जन सामान्यास आवश्यक असल्यास माहिती त्वरीत उपलब्ध व्हावी, या करिता “डिजीटल महाराष्ट्र या उददेशाचा भाग म्हणून आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील बांधकाम व्यवस्थापन कक्षामार्फत व सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कार्यान्वीत होणा-या विविध रस्ते व इमारतींची अर्थसंकल्पिय भांडवली स्वरुपाची तसेच केंद्रीय योजनांतर्गत अर्थसहाय्य प्राप्त बांधकामे,रस्ते व इमारतीचे परीरक्षण व देखभाल दुरुस्तीची कामांची सद्यस्थितीची प्रत्यक्षात माहिती (Real Time)प्राप्त होण्याच्या अनुषंगाने अर्थसंकल्पीय अंदाज वाटप व संनियंत्रण प्रणालीव्दारे संनियत्रण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कामांच्या संनियंत्रणासाठी NIC व्दारे विकसित BEAMS प्रणालीचा अवलंब करण्यात येत आहे,त्याच धर्तीवर आदिवासी विकास विभागामार्फत करण्यात येणाऱ्या इमारती व रस्ते बांधकामासाठी खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक :**

१) आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील बांधकाम व्यवस्थापन कक्षामार्फत व सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कार्यान्वीत होणा-या विविध रस्ते व इमारतींची अर्थसंकल्पिय भांडवली स्वरुपाची तसेच केंद्रीय योजनांतर्गत अर्थसहाय्य प्राप्त बांधकामे,रस्ते व इमारतीचे परीरक्षण व देखभाल दुरुस्तीची तसेच ठेव स्वरुपाच्या कामांची सद्यस्थितीची प्रत्यक्षात माहिती (Real Time)प्राप्त होण्याच्या अनुषंगाने त्यांची अर्थसंकल्पीय अंदाज वाटप व संनियंत्रण प्रणालीव्दारे संनियत्रण करण्यात यावे.

२) आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत इमारत व रस्त्यांच्या बांधकामाची विभागाच्या अर्थसंकल्पीय अंदाज भाग-३ परिशिष्ट “ड” (प्रगतीपथावरील) मधील व अर्थसंकल्पविषयक निवेदन (नवीन बाबी) मध्ये समाविष्ट असलेल्या बांधकामाची माहिती

वित्त विभागाच्या बीम्स (BEAMS) प्रणालीवर अंतर्भूत करण्यासाठी (Upload) इमारतींच्या बाबतीत संबधित कार्यकारी अभियंता,सा.बां. (आदिवासी) विभाग यांना व रस्त्यांच्या बाबतीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा परिषद यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. ही माहिती एकत्रितपणे बांधकाम व्यवस्थापन कक्षाने प्राप्त करुन संबंधित कार्यासनांना वेळोवेळी उपलब्ध करुन द्यावी.

३) उपरोक्त प्रमाणे अंतर्भुत इमारत बांधकामांना मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष,आदिवासी विकास विभाग यांच्या मार्फत पुनर्विलोकन करुन त्यांनी प्रस्ताव संबंधित उपसचिवांमार्फत सादर केल्यानंतर अर्थसंकल्प कक्ष, आदिवासी विकास विभाग यांच्या मार्फत निधी वितरित करण्यात यावा.

४) रस्त्यांच्या बांधकामांच्या बाबतीत संबंधित उपसचिव, आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत पुनर्विलोकन करुन त्यांनी प्रस्ताव सादर केल्यानंतर अर्थसंकल्प कक्ष, आदिवासी विकास विभाग यांच्या मार्फत निधी वितरित करण्यात यावा.

५) अर्थसंकल्पिय बांधकामासाठी BEAMS प्रणालीतून कामनिहाय Authorization Slip काढणे क्रमप्राप्त करण्यात येत आहे, त्यानंतर निधी खर्ची टाकण्यात यावा.

६) आदिवासी विकास विभागाच्या प्रत्यक्ष वेळी अहवाल (Real Time Report) विभागाच्या http://tribal.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा.

६) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२९१६५७०९४९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.11.29 17:00:50 +05'30'

**( सु.ना. शिंदे )**
उप सचिव , महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२. मा.मंत्री, वित्त विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

५. मा. राज्यमंत्री, वित्त विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
६. मा.राज्यमंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग,यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. प्रधान सचिव, सा.बां. विभाग,मंत्रालय,मुंबई
११. आयुक्त, आदिवासी विभाग, नाशिक
१२. सर्व मुख्य अभियंता,सा.बां.विभाग
१३. मुख्य अभियंता,बांधकाम व्यवस्थापन कक्ष,आ.वि.वि,मंत्रालय,मुंबई
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. अपर आयुक्त, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
१६. सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विभाग
१७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १.मुंबई.
१८. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १.नागपूर .
१९. अधीक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ नाशिक/नागपूर
२०. सर्व अधीक्षक अभियंता,(सा.बां.विभाग)
२१. सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. सर्व उपसचिव सा.बां.विभाग, मंत्रालय,मुंबई
२३. सर्व अवर सचिव, कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
२५. कार्यकारी अभियंता,सा.बां. (आदिवासी) विभाग, ठाणे/धुळे/अमरावती/चंद्रपूर
२६. बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग (निवड नस्ती)
२७. कार्यासन ६, आ.वि.वि